**राज्याचे युवा धोरण २०१२**
**सन २०१४-१५ व २०१५-१६ राज्य युवा पुरस्कार घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बैठक -२२१६/प्र.क्र. ७१/ क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २७ फेब्रुवारी, २०१७

वाचा :

१. शासन निर्णय, शा.शि.व. क्री.वि.क्र.युकयो २०१२/प्र.क्र.६५/क्रीयुसे-३ दिनांक १२.११.२०१३
२. शासन निर्णय, शा.शि.व. क्री.वि.क्र.युकयो १६१३/प्र.क्र.६६/क्रीयुसे-३ दिनांक १९.१२.२०१३
३. शासन निर्णय, शा.शि.व. क्री.वि.क्र.युकयो २०१२/प्र.क्र.६५/क्रीयुसे-३ दिनांक २७.०३.२०१४
४. शासन निर्णय, शा.शि.व. क्री.वि.क्र.युकयो २४१४/प्र.क्र.९४/क्रीयुसे-३ दिनांक २२.०८.२०१४

**प्रस्तावना :**

राज्यातील / जिल्ह्यातील युवांनी केलेल्या समाजहिताच्या कार्याचा गौरव व्हावा व युवा विकासाचे कार्य करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन मिळावे, यासाठी राज्य व जिल्हास्तरावर प्रति वर्षी युवा पुरस्कार देण्यास संदर्भाधिन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या संदर्भात जिल्हा स्तर पुरस्कारासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तर पुरस्कार निवड समिती तर राज्यस्तर पुरस्कार निवड समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

जिल्हा युवा पुरस्कार जिल्हा स्तरावर एक युवक, एक युवती तसेच नोंदणीकृत संस्था यांना देण्यात येणार आहे. तर राज्यस्तरावर युवा पुरस्कार क्रीडा विभागाचे क्षेत्रीय विभागानुसार प्रत्येक विभागातील एक युवक, एक युवतीस तसेच एक नोंदणीकृत संस्था यांना देण्यात येणार आहे. राज्य पुरस्काराचे स्वरुप गौरवपत्र, सन्मानचिन्ह, रोख पुरस्कार व्यक्ती रु. ५०,०००/- व संस्थेसाठी गौरवपत्र, सन्मानचिन्ह, रोख पुरस्कार रु. १,००,०००/- असा आहे. मा.मंत्री क्रीडा व युवक कल्याण यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तर पुरस्कार निवड समितीच्या दि. २४/८/२०१६ व दि. ०४ जानेवारी, २०१७ रोजी झालेल्या बैठकीमध्ये या संदर्भात प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी होऊन त्याप्रमाणे सन २०१४-१५ व २०१५-१६ या वर्षाकरीता राज्य युवा पुरस्कारार्थींची निवड करण्यात आली. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त पार्श्वभुमीवर राज्य युवा पुरस्कार सन २०१४-१५ व २०१५-१६ या करीता मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीने क्रीडा विभागाच्या आठ विभागातून (मुंबई, नाशिक, पुणे, कोल्हापूर, औरंगाबाद, लातूर, नागपूर अमरावती,) प्रत्येकी आठ युवक, आठ युवती व आठ संस्थांची निवड केली असून त्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. याबाबतच्या राज्य युवा पुरस्कारार्थींची यादी सोबतच्या परिशिष्टानुसार आहे.

२. उपरोक्त राज्य युवा पुरस्कारार्थींना पुरस्कार प्रदान करण्याच्या दृष्टीने आवश्यक ती पुढील कार्यवाही आयुक्त/संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तात्काळ करावी. त्याचप्रमाणे सदर योजनेवरील खर्च हा मागणी क्रमांक ई-३-२२०४, क्रीडा व युवक सेवा १०३ विद्यार्थीतर युवक कल्याण कार्यक्रम, १०-युवक कल्याण-ग्रामिण भाग, १०-युवा धोरणांतर्गत योजना, युवा पुरस्कार (२२०४-५५६४) ३१ सहायक अनुदाने वेतनेतर या लेखाशिर्षांतर्गत सन २०१६-१७ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२७१५२११६७५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suhas Ramrao Chavan

Digitally signed by Suhas Ramrao Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suhas Ramrao Chavan
Date: 2017.02.27 15:25:36 +05'30'

**( सुहास रा. चव्हाण )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (शा.शि. व क्री.वि.) यांचे स्वीय सहायक.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) श्री. मिलींद भोईर, पुणे (संचालनालयामार्फत).
५) श्री. शंतनु जगदाळे, पुणे (संचालनालयामार्फत).
६) राज्य समन्वयक, नेहरु युवा केंद्र, मुंबई.
७) सर्व जिल्हाधिकारी (संचालनालयामार्फत).
८) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत).
९) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत).
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११) उपरोक्त सर्व राज्य युवा पुरस्कारार्थींना संचालनालयामार्फत पत्राद्वारे.
१२) अवर सचिव (क्रीयुसे १ व २) शा.शि. व क्री.वि. मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती.

शासन निर्णय क्रमांक बैठक/२२१६/प्र.क्र.७१/क्रीयुसे-३ दिनांक २७ फेब्रुवारी, २०१७ चे सहपत्र

परिशिष्ट

राज्य युवा पुरस्कारार्थींची यादी सन २०१४-१५ व २०१५-१६

| अ.क्र. | विभागाचे नाव | सन २०१४-१५ | | | सन २०१५-१६ | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | युवक | युवती | संस्था | युवक | युवती | संस्था |
| १ | मुंबई विभाग | प्रतिम सुतार, रायगड | स्नेहल शिंदे- मुंबई शहर | प्रिझम सामाजिक विकास संस्था, मुंबई उपनगर | विनायक कोळी, ठाणे | प्रणिता गोंधळी, रायगड | पंचशील सेवा संघ, मुंबई उपनगर |
| २ | नाशिक विभाग | विनित मालपूरे, नाशिक | पुनम घुगे, नाशिक | वनवासी उत्कर्ष समिती, नवापूर, नंदुरबार | मनोहर जगताप, नाशिक | रुपाली माळी, धुळे | भरारी बहुउद्देशीय संस्था, जळगांव |
| ३ | पुणे विभाग | प्रविण निकम, पुणे | नेहा भाटे, पुणे | स्नेहालय संस्था, अहमदनगर | चिंतामणी पवार- सोलापूर | दिक्षा दिंडे, पुणे | अनाम प्रेम संस्था, अहमदनगर |
| ४ | कोल्हापूर विभाग | लखन दिलिप जाधव, कोल्हापूर | श्वेता परुळेकर, कोल्हापूर | नेहरु युवा मंडळ, पांगारी, जि सातारा | अजित शिवाजी पोवार, कोल्हापूर | प्रियांका पाटील, कोल्हापूर | जन कल्याण संस्था, कोल्हापूर |
| ५ | औरंगाबाद विभाग | पठाण अझहर खान, औरंगाबाद | कुमारी काजल सुदामराव भुसारे, परभणी | शाहू महाराज प्रतिष्ठाण, बीड | स्वनील चंदणे, औरंगाबाद | अश्विनी महिरे, औरंगाबाद | युवा प्रतिष्ठान, हिंगोली. |
| ६ | लातूर विभाग | उमाकांत मिटकर, उस्मानाबाद | सुरेखा गिरी, लातूर | सोपानराव तादालापूरकर क्रीडा मंडळ नायगाव, नांदेड | प्रविण पाटील, लातूर | कृष्णाई उळेकर, उस्मानाबाद | पर्यावरण व वन्यजीव संरक्षण सेवा भावी संस्था, नांदेड |
| ७ | नागपूर विभाग | सारंग रघाटटे, वर्धा | पल्लवी आमटे, चंद्रपूर | इको प्रो.बहु. संस्था, चंद्रपुर | राजेश तलमले- भंडारा | अर्चना चुधरी, गडचिरोली | आरोग्य प्रबोधिनी, गडचिरोली |
| ८ | अमरावती विभाग | विशाल राखोडे, अमरावती | खुशबू चोपडे, अकोला | दीपस्तंभ संस्था, अमरावती | ऋषीकेश खिलारे, अमराती | शारदा सोनकर, अकोला | स्वामी विवेकानंद बहू शैक्षणिक संस्था शिरपुर, मालेगांव, वाशिम. |